**भारतीय पोलीस सेवेतील अधिका-यांना मत्ता व दायित्व विवरणपत्र सादर करण्यासाठी मुदतवाढ देणेबाबत तसेच वार्षिक अचल मालमत्ता विवरणपत्रे दिनांक ३१ जानेवारी, २०१५ पर्यत सादर करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः आयपीएस-३७१४/प्र.क्र.५/पोल-१,**
गृह विभाग, ३० वा मजला, सेंटर-१,
जागतिक व्यापार केंद्र, कफ परेड,मुंबई-४०००05.
तारीख: १७ जानेवारी, २०१५

<u>वाचा</u>

१) कार्मिक, लोकगाऱ्हाणी व निवृत्तीवेतन मंत्रालय, कार्मिक व प्रशिक्षण विभाग, अधिसूचना, दिनांक १४.०७.२०१४.
२) कार्मिक, लोकगाऱ्हाणी व निवृत्तीवेतन मंत्रालय, कार्मिक व प्रशिक्षण विभाग, पत्र क्र. ११०१७/ ०३/२०१४-AIS III, दिनांक ०४.०८.२०१४
३) गृह व्यवहार मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. २६०१२/०१/२०१४-IPS II, दिनांक २६.०८.२०१४ व दिनांक ०९.०९.२०१५.
४) शासन पत्र, समक्रमांक, दिनांक २२.०८.२०१४, दिनांक ०३.०९.२०१४ व दिनांक ०१.१०.२०१४
५) कार्मिक, लोकगाऱ्हाणी व निवृत्तीवेतन मंत्रालय, कार्मिक व प्रशिक्षण विभाग, ज्ञापन क्र. ४०७/१२/२०१४-AVD-IV(B), दिनांक २५.१२.२०१४.

## परिपत्रक

लोकपाल आणि लोकायुक्त अधिनियम,२०१३ अंतर्गत लोकसेवक (मत्ता व दायित्वांचे वार्षिक विवरणपत्र सादर करणे व विवरणपत्रे दाखल करण्यामधून सूट देण्यासाठी मत्त्याची मर्यादा ) नियम, २०१४ दिनांक १४.०७.२०१४ रोजी अधिसूचित झाल्याने या वर्षाकरीता ज्या लोकसेवकांनी त्यांना लागू असलेल्या अन्य नियमानुसार वार्षिक मालमत्ता विवरणपत्रे दाखल केली असतील अशा लोकसेवकांनी दिनांक ०१ ऑगस्ट, २०१४ ची स्थिती दर्शविणारे सुधारीत मत्ता व दायित्वांचे विवरणपत्र दिनांक १५.०९.२०१४ पर्यत सादर करण्याच्या सूचना गृह व्यवहार मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांनी दिल्या होत्या. दिनांक ०९.०९.२०१४ च्या पत्रान्वये ही मुदत दिनांक ३१.१२.२०१४ पर्यत वाढविण्यात आली होती.

२. केंद्र शासनाच्या कार्मिक, लोकगाऱ्हाणी व निवृत्तीवेतन मंत्रालय, कार्मिक व प्रशिक्षण विभागाच्या दिनांक २५.१२.२०१४ च्या ज्ञापनान्वये लोकसेवकांनी सुधारीत मत्ता व दायित्वांची विवरणपत्रे सादर करण्याची कालमर्यादा दिनांक ३०.०४.२०१५ पर्यत वाढविली आहे. तसेच यासंदर्भात केंद्र शासनाने दिनांक २६.१२.२०१४ च्या अधिसूचना निर्गमित केली आहे. (प्रती सोबत जोडल्या आहेत) त्यानुसार महाराष्ट्र संवर्गातील सर्व भापोसे अधिकाऱ्यांनी विहित नमुन्यातील दिनांक ०१.०८.२०१४ ची स्थिती दर्शविणारी सुधारीत मत्ता व दायित्वाची विवरणपत्रे परस्पर गृह व्यवहार मंत्रालय,भारत सरकार, नवी दिल्ली "IPS-II Section (Room No.२१९-A), North Block, New Delhi-१" येथे व us-ips२@mha.gov.in या ईमेलवर पाठविण्याची कार्यवाही करावी.

३. अखिल भारतीय सेवा (वर्तणूक) नियम १९६८ मधील नियम १६(२) नुसार अखिल भारतीय सेवेतील प्रत्येक सदस्याने दरवर्षी दिनांक १ जानेवारीची स्थिती दर्शविणारी अचल मालमत्ता विवरणपत्रेदेखील दिनांक ३१ जानेवारी पूर्वी सादर करणे आवश्यक आहे. अखिल भारतीय सेवा (वर्तणूक) नियम, १९६८ मधील नियम १६(२) मध्ये केंद्र शासनाने अद्यापपर्यत सुधारणा केलेली नाही. अखिल भारतीय सेवा (वर्तणूक) नियम, १९६८ मधील नियम १६(२) नुसार भारतीय पोलीस सेवेतील अधिकाऱ्यांनी दरवर्षीप्रमाणे दिनांक ०१.०१.२०१५ ची स्थिती दर्शविणारी त्यांची वार्षिक अचल मालमत्ता विवरणपत्रे दिनांक ३१.०१.२०१५ पूर्वी खालील कार्यपध्दतीनुसार "IPS-II Section (Room No.२१९-A), North Block, New Delhi-१" येथे व us-ips२@mha.gov.in या ईमेलवर पाठविण्याची कार्यवाही करावी.

अ) दिनांक ०१.०१.२०१५ ची स्थिती दर्शविणारी सन २०१४ चे वार्षिक अचल मालमत्ता विवरणपत्र (Immovable Property Return) सोबत जोडलेल्या विहित नमुन्यात दिनांकित स्वाक्षरीसह दोन प्रतीत, सीलबंद लिफाफ्यात गृह व्यवहार मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांच्याकडे दिनांक ३१.०१.२०१५ पर्यत सादर करावेत.

ब) अचल मालमत्ता विवरण सीलबंद केलेल्या लिफाफ्यावर खालील बाबी स्पष्टपणे नमूद कराव्यात.

i) Name and Designation of the Officer

ii) Allotment Year

iii) Year of Property Return : २०१४ ( As on १.१.२०१५)

क) भारतीय पोलीस सेवेतील अधिकाऱ्यांनी त्यांचे वार्षिक अचल मालमत्ता विवरणपत्र विहित कालावधीत सादर करणे ही बाब संबंधित अधिकाऱ्यांच्या दक्षता प्रमाणपत्राशी (Vigilance Clearance Certificate) निगडीत केलेली असल्याने कोणत्याही परिस्थितीत दिनांक ३१.०१.२०१५ पर्यत अचल मालमत्ता विवरणपत्र त्यावर स्वाक्षरी व दिनांक नमूद करुन वर

नमूद पत्त्यावर पाठविण्यात यावा. तसेच यासंदर्भात केलेली कार्यवाही शासनास अवगत करावी.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०११७१५३२४६७७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Charushila Devendra Chaudhari

Digitally signed by Charushila Devendra Chaudhari
DN: CN = Charushila Devendra Chaudhari, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Home
Date: 2015.01.17 16:28:28 +05'30'

**( चारुशीला चौधरी )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल,मुंबई.
२. मा.मुख्य मंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्यादित, मुंबई.
६. महासमादेशक, गृह रक्षक व संचालक, नागरी संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सुरक्षा महामंडळ, मुंबई.
८. महाराष्ट्र संवर्गातील सर्व भापोसे अधिकारी (प्रतिनियुक्तीसह) ( पोलीस महासंचालक, म.रा. मुंबई यांचे मार्फत)
९. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, गृह विभाग, ३० वा मजला, सेंटर-१, जा.व्या.केंद्र, कफ परेड, मुंबई
१०.सचिव (विशेष) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, गृह विभाग, ३० वा मजला, सेंटर-१, जा.व्या.केंद्र, कफ परेड, मुंबई
११.उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती/पोल-१